तात्काळ/कालमर्यादा




रत्नाकर गायकवाड
मुख्य सचिव

क्र.प्लास्टिक ०६११/(प्र.क्र.१०५/२०११)/तां.क.४
पर्यावरण विभाग,
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०११

विषय : केंद्र शासनाच्या प्लास्टिक कचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २०११ मधील तरतुदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याबाबत

प्रिय

गुटखा तसेच तंबाखूयुक्त पानमसाला इत्यादीची बांधणी/विक्री करतांना प्लास्टिकचा कोणत्याही स्वरुपात वापर करण्यांत येऊ नये, असे मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश असून त्यास अनुलक्षून केंद्र शासनाने प्लास्टिक कचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २०११ जाहीर केले आहेत. या कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी दाखल केलेल्या अवमान याचिकेच्या दिनांक ११.०५.२०११ रोजी झालेल्या सुनावणीच्यावेळी मा.सर्वोच्च न्यायालयाने "गुटखा, तंबाखूयुक्त पानमसाला इ.ची बांधणी /विक्री करतांना प्लास्टिकचा कोणत्याही स्वरुपात वापर करण्यांत येऊ नये या दिनांक ०७.१२.२०१० रोजी दिलेल्या आदेशाची कडक अंमलबजावणी करावी " असे आदेश दिले आहेत.

२. याबाबत आपले लक्ष केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाच्या दिनांक ०४.०२.२०११ रोजीच्या भारताच्या राजपत्रात अधिसूचित प्लास्टिक कचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २०११ कडे वेधण्यात येत असून त्या नियमांतर्गत महानगर पालिका/नगर परिषदा या घन कचरा व्यवस्थापन यंत्रणा उभारणे, कार्यान्वित करणे, आणि समन्वय यासाठी जबाबदार असून त्याला संलग्न असलेले प्लास्टिक कचऱ्याचे संकलन, साठवणूक, विलगीकरण, वाहतूक, प्रक्रिया आणि विल्हेवाट इत्यादींशी संबंधित तरतुदींची अंमलबजावणी करण्याकरिता देखील जबाबदार आहेत. महानगर पालिकांनी / नगर परिषदांनी प्लास्टिक कचरा जमा करण्यासाठी केंद्र उभारणे आवश्यक असून उत्पादकांच्या वाढीव जबाबदारीच्या तत्वानुसार त्यासाठी प्लास्टिक उत्पादकांना सामील करुन घेणे, प्लास्टिक पुनर्वापरासाठी पुरवठा कायम ठेवणे, सर्व संबंधित घटकांमध्ये जबाबदारीची जाणीव निर्माण करणे आणि त्यासाठी कचरा व्यवस्थापनामध्ये कार्यरत असलेल्या संस्थांची/ कचरा वेचणाऱ्यांची मदत घेणे अपेक्षित आहे. सबब आपण त्यानुसार तातडीने कार्यवाही करावी.

३. त्याचप्रमाणे केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाच्या दिनांक ४.०२.२०११ रोजीच्या प्लास्टिक कचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २०११ च्या नियम १० नुसार कोणतीही प्लास्टिकची पिशवी ग्राहकाला मोफत देण्यात येऊ नये, असे आदेश देण्यात आलेले आहेत. त्या अनुषंगाने सर्व नगरपालिकांनी प्लास्टिकच्या पिशवीची, पिशवीचे आकारमान व गुणवत्तेप्रमाणे, किमान किंमत किती असावी, हे ठरवून त्या विषयी अधिसूचना काढणे अपेक्षित आहे. वरील प्रमाणे अधिसूचना काढण्याची कार्यवाही विनाविलंब करण्यात यावी.

४. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कार्यवाही करणे बंधनकारक असून त्याचे अनुपालन न केल्यास तो न्यायालयाचा अवमान होऊ शकतो, आणि ही अत्यंत गंभीर बाब ठरु शकते हे लक्षात घेता, या प्रकरणी आपण स्वत: जातीने लक्ष घालून मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार केंद्र शासनाच्या प्लास्टिक कचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २०११ मधील तरतुदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी व आपण केलेल्या व करीत असलेल्या कार्यवाहीचा त्रैमासिक अनुपालन अहवाल शासनास न चुकता सादर करावा.

सस्नेह,

आपला स्नेहांकित,

(रत्नाकर गायकवाड)

**सर्व आयुक्त, महानगर पालिका,**
**सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा.**

प्रत : आयुक्त, नगरपालिका प्रशासन, जी.टी.एस. बिल्डिंग, ३ रा मजला, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई ४०० ०३० यांजकडे अग्रेषित.